

ई - साहित्य प्रकाशन
वर्ष : तिसरे , अंक : ९
दिनांक : २८.०२.२०११
www.esahity.com

# नेटाक्षरी

२७ फेब्रुवारी हा कुसुमाग्रजांचा जन्मदिन मराठी राज्यभाषा दिन म्हणून साजरा केला जातो.
नेटाक्षरीतर्फे तमाम मराठी जनतेस मराठी दिनाच्या हार्दिक शुभेच्छा.

**- संपादक -**
स्वप्ना कोल्हे ( नाशिक )

**- सहसंपादक -**
सोनाली घाटपांडे ( पुणे )
भारती सरमळकर ( मुंबई )
सचिन काकडे ( मुंबई )
शशिकांत रणवरे ( मुंबई)




## ह्या अंकात वाचा..
## मी मराठी

हा विनामूल्य अंक नियमित मिळण्यासाठी तसेच सूचना,अभिप्राय,प्रतिक्रियांसाठी netaksharee@gmail.com



## * * मराठी विश्व * *

नवविश्वासाने उजळत मराठी विश्व
विश्वाशी जडावे अवघे मराठी विश्व

लवलवती लावणी,दणकेबाज पवाडा
हळुवार भावगीत,विद्रोहाचा राडा
गुदगुल्या विनोदी,नाट्यकथा भारुडा
हर भाव टिपतसे सच्चे मराठी विश्व
विश्वाशी जडावे अवघे मराठी विश्व

ही ज्ञानोबा तुकयाची रसाळ वाणी
झुळझुळ वाहते दशकोटींची कहाणी
ह्रदयात नांदती रक्तासंगे गाणी
सह्याद्रीजैसे कणखर मराठी विश्व
विश्वाशी जडावे अवघे मराठी विश्व

कवी संत आमुचे मृदू मेणाहून थोर
वेळेवर उपसत भवानीची तलवार
पसरले आज हे सात समुद्रापार
दशदिशांत दुमदुमणार मराठी विश्व
विश्वाशी जडावे अवघे मराठी विश्व

हा नवा आत्मविश्वास उद्याची आशा
या भाषेच्या शब्दांत वसे जिजिविषा
मनगटांत फुरफुरणारी ही विजिगिषा
भन्नाट उधळते वारू मराठी विश्व
विश्वाशी जडावे अवघे मराठी विश्व

- नाम गुम जायेगा ( ठाणे )





## * * मुठ * *

आता काय भिती कशाला कुणाची ?
अशी मुठ माझी मराठी मनाची

येऊ दे वादळे,येऊ दे धुळ माती
तमा ना कशाची न धास्ती कशाची

आम्ही एक आहो,मराठीच बाणा
अशी मुठ माझी मराठी मनाची

कशाला डरावे मृत्यूस आता
किती थोर मरणे मराठी भूमीशी

पुन्हा काळ होऊ परक्यांस आता
अशी मुठ माझी मराठी मनाची

- संतोष बडगुजर ( पुणे )





## * * मायमराठी * *

कुल आमुचे असे मराठी
आम्ही जाणतो मायमराठी

आमुच्या उरात दाटते मराठी,अंतरात डोलते मराठी
तनामनात धुंदते मराठी,मनगटात स्फुरते मराठी
नसानसांत सळसळे मराठी,कर्णि गुंजते मायमराठी

वनात दरवळे इथे मराठी,फुला मुलांत खेळते मराठी
तळ्यामळ्यात लहरते मराठी,कडीकपारी हिंडते मराठी
दरीदरीत वर्षते मराठी,सह्याद्रीत गर्जते मायमराठी

अशी शौर्याची तलवार मराठी,मैदाने गाजवी मराठी
लाल मातीत लोळते मराठी,रंगायतनी रंगते मराठी
मंदिरात दुमदुमे मराठी,इंद्रायणी खळखळे मराठी

आमुची वीरांची विराट मराठी,संतांची विराग मराठी
कैक पाहुणे पोसते मराठी,अमराठ्यांचे माहेर मराठी
चांद्यापासून बांद्यापर्यंत घराघरांत नांदते मायमराठी

- सुरेश शिरोडकर ( मुंबई )





## * * मराठी * *

जन्मलो ज्या मातीत ती माती मराठी
बिलगलो ज्या छातीस ती छाती मराठी

चाललो पकडून हातास तो हात मराठी
लाभली आजवर साथ ती साथ मराठी

बोललो शब्द पहिला तो शब्द मराठी
लिहीले पहिले अक्षर ते अक्षर मराठी

गुणगुणलो जे गीत ते गीत मराठी
जडली मनास प्रीत ती प्रीत मराठी

भांडले वेळीस भक्त ते भक्त मराठी
सांडले ऐक्याने रक्त ते रक्त मराठी

उतरवून निराशेची कात चढवा कात मराठी
विसरुनी सारी जात लढवा जात मराठी

बोलीन एक भाषा ती भाषा मराठी
दाखवीन उद्याची आशा ती आशा मराठी

- अमरीश भिलारे ( मुंबई )





## * * मराठी * *

भाग्यविधाते देशाचे आम्ही मराठी मराठी
भाग्य असे आमचे हो आम्ही मराठी मराठी
भक्तीरसात भिजवी वीररसात चेतवी
श्रृंगाररसात रमवी करुणरसात आर्तवी
नवरसात न्हाहवी ग्रंथसंपदा मराठी
भाग्य असे आमचे हो आम्ही मराठी मराठी
मुकुंद रायांची मराठी,ज्ञाना तुकयाची मराठी
चक्रधरांची मराठी नामा जनाईची मराठी
दास तुकड्याची मराठी सकल संतांची मराठी
भाग्य असे आमचे हो आम्ही मराठी मराठी
शिवरायांची मराठी लोकमान्यांची मराठी
भीमरावांची मराठी शाहू फुल्यांची मराठी
बहिणाईची मराठी रामानंदांची मराठी
भाग्य असे आमचे हो आम्ही मराठी मराठी
नटसम्राट मराठी खेळसम्राट ही मराठी
गानकोकिळा मराठी स्वरभास्कर मराठी
नवरत्नांची खाण प्रसविते माय मराठी
भाग्य असे आमचे हो आम्ही मराठी मराठी
डोंगर माथ्यावर मराठी सागरतीरीही मराठी
महानगरी मराठी खेड्यापाड्यात मराठी
वनी काननी मराठी उद्योग क्षेत्रात मराठी
भाग्य असे आमचे हो आम्ही मराठी मराठी
तख्त दिल्लीचे हालवी,छत्रपति हा मराठी
पानिपत ही गाजवी अहो बाणा हा मराठी
लाज राखे हिमालयाची सह्यकडा हो मराठी
भाग्य असे आमचे हो आम्ही मराठी मराठी
चला बोलूया मराठी चला लिहूया मराठी
वाढवूया हो मराठी बाणा अस्सल मराठी
अभिमानाने बोलू सारे मायबोली ही मराठी
भाग्य असे आमचे हो आम्ही मराठी मराठी

- सुनील जोशी (नागपूर)





## * * मराठी आमचे नाव * *

माती इथली दरवळते चंदनाचा सुवास घेऊन
कमंडलूही तृप्त होतो इथले पाणी पिऊन

परचक्राचे कंठ फोडती योध्यांच्या पाती
जागरणाचे शंख फुंकती सन्याशांच्या छाती

तलवारीच्या धारेवर चमकतो ज्वाळेचा रंग
अजूनही इथल्या वाऱ्यावर वाहतो भक्तीचा गंध

ग्रंथसंपदा ल्याली इथे घेऊन सरस्वतीचा साज
लेखणी देखील उतरवते तलवारीचा माज

शेतकऱ्याच्या मातीला गंध येतो घामाचा
कष्टाच्या तगडीत करतो हिशोब पापपुण्याचा

चाफेकरांच्या रक्ताला सावरकरांचे तत्व
शिवरायांच्या शस्त्राला तुकोबांचे सत्व

खेळू नका आमच्याशी मुठी इथल्या तप्त
आत्मांमध्ये वास करतो ज्ञानेश्वर असा सुप्त

समर्थांचा वारसा सांगतो ब्रम्ह आमची उक्ती
झेंडे रोवले अटकेपार क्षात्र आमची शक्ती

लोह आमचा देव क्षत्रिय आमचा भाव
ब्राम्हण आम्ही वृत्तीने मराठी आमचे नाव

- चिराग पत्की ( मुंबई )





# * * मराठी * *

उसळतो हिंदवी बाणा नसानसांत
स्वप्न लोचनी फक्त स्वातंत्र्याचे
प्रभात सोनेरी नभी आम्हांमुळे
जिचा सूर्य कधी ढळत नाही
मराठी रक्त कधी गोठत नाही

तोड ना कुणाला ठाव ज्याचे
असे पाषाणांचे ह्रदय आमचे
यातनांना असल्या पाझरत नाही
मराठी रक्त कधी गोठत नाही

निधड्या छातीत वार झेलत
सह्याद्रीचे कडे राखतो
जीव हाती घेऊन लढतांना
माघार घेणं खपत नाही
मराठी रक्त कधी गोठत नाही

भगव्यासाठी लढलो
लढून मरलो
मरुन जगणाऱ्या झुंझार मावळयांच्या
समशेरची धार बोथट नाही
मराठी रक्त कधी गोठत नाही

गड आले सिंह गेले
ह्या मावळयांनी इतिहास केले
माय भवानीची लेकरे ती
तिच्याच कुशीत गेले
उपकार तयांचे विसरत नाही
मराठी रक्त कधी गोठत नाही

हिंदवी हेच आमचे ध्येय
त्यास रक्तानेच वाहतो अर्घ्य
जयघोषांचे एकच नाव ओठी
जाणितो जिला मायमराठी..मायमराठी

- विक्रांत उमप ( नागपूर )





रसिकांना नेहमी उत्तमोत्तम आणि नवनवीन काव्य पुरविण्याचा

ई-साहित्य प्रकाशनाचा ध्यास 'नेटाक्षरी' जोमाने पार पाडत आहे. दर आठवड्यात मिळणाऱ्या तुमच्या प्रतिसादांनी आमचा उत्साह द्विगुणीत होतोय.नेटाक्षरी हा साप्ताहिक अंक सध्या सुमारे ६०००० मराठी रसिकांना विनामूल्य वितरीत केला जातो.

त्या व्यतिरिक्त संकेतस्थळाला भेट देऊन वाचणाऱ्यांची संख्याही लक्षणीय आहे.

हा अंक आपण आपल्या ईष्टमित्रांना फॉरवर्ड करण्यास आमची काही हरकत नाही परंतु असे करताना आमच्या आयडीचा अंतर्भाव केल्यास आम्ही आभारी राहू. मराठी कवितेची लोकप्रियता वाढवण्यास आपला हातभार लाभावा हीच इच्छा. आपल्यासारख्या रसिकांच्या सहाय्याने हा अंक लवकरच एक लक्ष वाचकांपर्यंत नियमित पोहचवण्याचा आमचा संकल्प सिध्दीस जाईल असा आम्हाला विश्वास आहे.

**– ई साहित्य प्रतिष्ठानची इतर विनामुल्य ई साप्ताहिके –**

स्वरनेटाक्षरी ऑडिओ अल्बम , बाल नेटाक्षरी , ई श्टाप

**– प्रसिध्द झालेली ई बुक्स –**

टल्लीची शाळा,मकरंदच्या त्रिवेण्या,ग्रेव्हयार्ड लिटरेचर,चार क्षण, तो आणि ती,प्रियेचे अभंग,देशी दारुचे दुकान, ई शाळा, तो, मी आणि सिगरेट, मोरया, लोकल गोष्टी , मीरा(अनुवाद),ओथंब,सावळ्या मुलीची गाणी,सईची वही

आमची ई बुक्स विनामूल्य मिळण्यासाठी - esahity@gmail.com

हा विनामूल्य अंक नियमित मिळण्यासाठी तसेच सूचना,अभिप्राय,प्रतिक्रियांसाठी - netaksharee@gmail.com

आता ई साहित्यची वरील सर्व प्रकाशने सीडी मध्ये उपलब्ध आहेत ५० रुपयांत १११ ई पुस्तके . संपर्क करा – ९८६९६७४८२०

आपल्या स्वरचित कविता नेटाक्षरीत प्रकाशित करण्यासाठी - meekavee@gmail.com